सर्वसाधारण बदल्या सन २०१५
महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा,
गट-अ मधील  विशेषज्ञ संवर्ग

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन आदेश क्रमांकः बदली-२०१५/प्र.क्र. १८६/सेवा-२

गो.ते.रुग्णालय इमारत संकुल,१० वा मजला,
मंत्रालय, मुंबई  ४०० ००१.
तारीख: ३१ मे,२०१५

**शासन आदेश  -**

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम,२००५ मधील तरतुदींनुसार सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा,गट-अ (वेतनश्रेणी रु.१५६००-३९१०० ग्रेड पे ६६००) मधील विशेषज्ञ संवर्गातील अधिकाऱ्याची खालीलप्रमाणे बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव व सध्याची पदस्थापना | बदलीचे कारण | बदलीने पदस्थापना |
|---|---|---|---|
| १. | डॉ. संजोग सी. कदम, अस्थिव्यंगोपचारतज्ञ, सामान्य रुग्णालय, सातारा | प्रशासकीय कारणास्तव | अस्थिव्यंगोपचारतज्ञ, सामान्य रुग्णालय, रत्नागिरी (रिक्त पदी) |

२. उपरोक्त बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यास त्यांच्या नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होण्याकरीता तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे . संबंधित अधिकाऱ्याने त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी त्वरीत हजर झाल्यानंतर लगेचच कार्यभार हस्तांतर प्रमाणपत्रासह त्यांचा रुजू अहवाल संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांच्यामार्फत विहीत मार्गाने शासनास न चुकता विनाविलंब  शासनास सादर करावा.

३. संबंधित अधिकाऱ्याने त्यांच्या  नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा.  तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जावू नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक:- सीडीआर १०८२/ २५६७/२८/अकरा, दिनांक ३०/८/१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेवून बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कार्यवाहीस पात्रठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

४.	बदली आदेशाची प्रभावीपणे अंमलबजावणी होण्यासाठी बदली आदेश प्राप्त होताच बदली झालेल्या अधिकाऱ्यांना कार्यालय प्रमुखांनी तात्काळ कार्यमुक्त करावे व सदरील अधिकाऱ्यांनी त्यांच्या बदलीच्या पदावर तात्काळ रुजू व्हावे. त्यांचे पुढील वेतन व भत्ते रुजू होणाऱ्या पदावरच काढण्यात येतील याची संबंधितांनी दक्षता घ्यावी अन्यथा संबंधितांना व्यक्तीश: जबाबदार धरण्यात येईल,याची नोंद घ्यावी.

५.	संचालनालयाने जे अधिकारी त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होणार नाहीत, त्यांचेविरुध्द वेळीच प्रशासकीय कारवाई सुरु करावी व आवश्यकतेनुसार सदर प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर करावा. या प्रकरणी वेळोवेळी शासनास अवगत करावे व अनुपालन अहवाल शासनास विहित कालमर्यादत सादर करावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१५०५३०१९३७२०६६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशांनुसार व नावाने,

GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO

Digitally signed by GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO
DN: CN = GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = PUBLIC HEALTH,CID - 918117
Date: 2015.05.31 17:48:33 +05'30'

**(वि.पुं.घोडके)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
२) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई
३) उपसंचालक, आरोग्य सेवा, पुणे मंडळ, पुणे / कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर
४) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१ मुंबई /महाराष्ट्र-२ नागपूर
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१मुंबई /महाराष्ट्र-२ नागपूर
६) जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा /रत्नागिरी
७) जिल्हा शल्य चिकित्सक,सामान्य रुग्णालय, सातारा / रत्नागिरी
८) मा. मंत्री (आरोग्य)/मा.राज्यमंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव
९) मा.प्रधान सचिव (आरोग्य) यांचे स्वीय सहायक
१०) संबंधित अधिकारी (व्दारा संचालक,आरोग्य सेवा,मुंबई)//निवडनस्ती